**कुमार विश्वकोश खंड-२ (जीवसृष्टी व पर्यावरण), भाग-२ च्या ब्रेल लिपीतील ११५ प्रती राज्यातील अंध शाळांना मोफत वाटण्यास मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- कुविखं-२०१४/१८३/प्र.क्र.८३/ भाषा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १० सप्टेंबर, २०१४

**वाचा :-**

**१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक :- विनिम-२०११/८५/प्र.क्र.१९/ सां.का.- २, दिनांक- ३ फेब्रुवारी, २०११.**

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळामार्फत राबविण्यात येणा-या मुलांचा विश्वकोश या योजनेंतर्गत "बाल विश्वकोश" व "कुमार विश्वकोश" प्रत्येकी १२ खंडात प्रकाशित करण्यात येणार आहेत. या योजनेत कुमार विश्वकोश जीवसृष्टी व पर्यावरण खंड-२, भाग-१ ब्रेल लिपीत तयार करण्याचे काम नॅशनल असोसिएशन ऑफ ब्लाईंड, मुंबई या सेवाभावी संस्थेने केले होते व त्याच्या ११५ प्रतीसाठी झालेल्या रू.२,६९,८७५/- इतक्या खर्चास पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या दि.३ फेब्रुवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सदर प्रती अंध शाळांना मोफत वाटण्यात आलेल्या आहेत.

कुमार विश्वकोश जीवसृष्टी व पर्यावरण खंड-२, भाग-२ हा खंड ब्रेल लिपीत प्रसिद्ध करण्यात येत असून सदर काम मुंबई येथील नॅशनल असोसिएशन ऑफ ब्लाईंड या सेवाभावी संस्थेमार्फत करण्यात येणार आहे. सदर खंड ब्रेल लिपीत तयार करण्यासाठी येणाऱ्या

रू.१,४०,५००/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून सदर खंडाच्या ११५ प्रती राज्यातील मराठी अंध शाळांना मोफत वाटण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१०१५५६३२३७३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vrushali Vasant Sawant

Digitally signed by Vrushali Vasant Sawant
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vrushali Vasant Sawant
Date: 2014.09.10 15:51:29 +05'30'

**वृषाली सावंत**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, मुंबई महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ
२. संचालक, नॅशनल असोसिएशन ऑफ ब्लाईंड, मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई,
५. महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), नागपूर,
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), महाराष्ट्र , मुंबई
८. निवड नस्ती